मराठवाडा विभागासाठी ग्रीड पध्दतीने पाणी पुरवठा करण्याच्या योजनेचा पूर्व व्यवहार्यता अहवाल तयार करण्यासाठी मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११६/प्र.क्र.१२२ /पापु-०७**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
तारीख ०६ डिसेंबर, २०१६.

**प्रस्तावना :-**

सततच्या कमी पर्जन्यमानामुळे मराठवाडयातील जनतेस वारंवार पाणी टंचाईस तोंड दयावे लागते. त्यामुळे गेल्या २ ते ४ वर्षांपासून मराठवाडा विभागामध्ये मोठया प्रमाणामध्ये पाणी टंचाई निर्माण झाली आहे. या वर्षी २०१६ च्या उन्हाळयात मराठवाडयामध्ये सुमारे ४००० टॅंकर्स द्वारे पाणी पुरवठा करण्यात आला आहे. या व्यतिरिक्त तात्पुरत्या पाणी उपाय योजना शासनास हाती घ्याव्या लागल्या. तसेच लातुर शहरास उद्भवलेल्या पाणी टंचाईसाठी मिरज, जि. सांगली येथुन अंदाजे ३०० कि.मी. अंतरावरुन एप्रिल-मे २०१६ दरम्यान रेल्वेद्वारे पाणी पुरविण्यात आले. या टंचाई कालावधीत टॅंकरद्वारे पुरविण्यात आलेल्या पाण्याची आवश्यक गुणवत्ता राखता येणे शक्य होत नसल्यामुळे आरोग्याच्या तक्रारी वाढत असल्याचे निदर्शनास आले आहे.उपरोक्त नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन मराठवाडा विभागासाठी औरंगाबाद येथे दिनांक ४ ऑक्टोबर, २०१६ रोजी झालेल्या मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीत मराठवाडा विभागातील पाणी समस्या सोडविण्याच्या दृष्टीने ग्रीड पध्दतीची पाणी पुरवठा योजना तयार करण्यासाठी तत्वत: मान्यता देण्यात आली आहे.

**शासन निर्णय:**

मराठवाडा विभागासाठी ग्रीड पध्दतीने पाणी पुरवठा योजनेस मा.मंत्रीमंडळाने तत्वत: मान्यता दिलेली असल्याने सदर योजनेचा पूर्व व्यवहार्यता अहवाल तयार करण्यासाठी मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे..

| | |
|---|---|
| (१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता | अध्यक्ष |
| (२) मा.मंत्री, जलसंपदा | सह अध्यक्ष |
| (३) मा.राज्यमंत्री, ग्राम विकास | सदस्य |
| (४) मा.राज्यमंत्री, नगर विकास | सदस्य |
| (५) मा.राज्यमंत्री, उद्योग | सदस्य |
| (६) अपर मुख्य सचिव, नियोजन | सदस्य |
| (७) अपर मुख्य सचिव, वित्त | सदस्य |
| (८) प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग | सदस्य |
| (९) प्रधान सचिव, जलसंपदा विभाग | सदस्य |
| (१०) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण | सदस्य |

| | |
|---|---|
| **(११) उद्योग विभागाचे प्रतिनिधी** | **सदस्य** |
| **(१२) नगर विकास विभागाचे प्रतिनिधी** | **सदस्य** |
| **(१३) ग्रामविकास विभागाचे प्रतिनिधी** | **सदस्य** |
| **(१४) संचालक, गोदावरी खोरे** | **सदस्य** |
| **(१५)संचालक (तांत्रिक), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण** | **सदस्य सचिव** |

२. उपरोक्त समितीद्वारे ग्रीड पध्दतीची पाणी पुरवठा योजनेची व्यवहार्यता तपासली जाईल. यामध्ये उद्भवाचे ठिकाण, धरणाची विश्वसनियता, योजनेच्या जुन्या उद्भवाची विश्वसनियता, योजनेत समाविष्ट शहर व गांवाना पाण्याची आवश्यकता आहे किंवा कसे ? तसेच योजनेसाठी विविध पर्यायाची पडताळणी करणे याकरिता जीपीएसद्वारे सर्वेक्षण करणे, नागरी व ग्रामीण योजनेच्या अस्तित्वातील पिण्याच्या पाण्याच्या स्त्रोताचे, जलशुध्दीकरण केंद्राचे, साठवण जलकुंभाचे व रस्त्याचे मॅपींग करुन पूर्व व्यवहार्यता अहवाल तयार करणे, इ. बाबी अपेक्षित आहेत

३. सदर समितीच्या बैठकांचे आयोजन इत्यादी तसेच समितीचा अंतिम अहवाल शासनास सादर करण्याची जबाबदारी संचालक (तांत्रिक) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांची राहील. या प्रकरणी होणाऱ्या प्रत्यक्ष खर्चाची प्रतिपूर्ती त्यांना शासनाकडून करण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२०६१०३७१९९९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Yashwant Tedgya Padvi

Digitally signed by Yashwant Tedgya Padvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WSSD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42f023d235c1f55c387492762e66530fd58085d2893f88445cf00fc7709a8080, serialNumber=c96ec3b84dfb89ca1fbee688d0dbc9e15c61e7e091602f1cc5c94657fc4d9c86, cn=Yashwant Tedgya Padvi
Date: 2016.12.06 15:08:59 +05'30'

**(य.टे.पाडवी)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.मंत्री (सर्व)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

६. सर्व सन्माननीय विधिमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई.

७. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव, मंत्रालय, मुंबई.

८. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, मंत्रालयीन विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

१०. विभागीय आयुक्त (सर्व)

११. संचालक (तांत्रिक) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

१२. संचालक, गोदावरी खोरे.

१३. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.

१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

१५. संचालक, समाज कल्याण संचालनालय, पुणे.

१६. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था, बेलापूर, नवी मुंबई.

१७. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)

१८. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता)

१९. मुख्य अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.

२०. अधीक्षक अभियंता/कार्यकारी अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.

२१. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद (सर्व)

२२. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व नियंत्रण अधिकारी व सर्व कार्यासने.

२३. शासकीय आय.आय.टी. संस्था, पवई, मुंबई.

२४. सर्व शासकीय अभियांत्रिकी (पदवी/पदविका) महाविद्यालये

२५. निवडनस्ती, कार्यासन पापु-०७)